**पुनर्वसन प्रकल्पासंदर्भात पुनर्वसनाच्या कामात सुसूत्रता आणण्यासाठी अभ्यास गट स्थापन करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- आरपीए २०१६/प्र.क्र.२९०/र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ११ /११/२०१६

**प्रस्तावना :-**

मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) तथा अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनस्थापना सनियंत्रण समिती यांनी महाराष्ट्र राज्य पुनर्वसन प्राधिकरण तथा राज्य पुनर्वसन व पुनस्थापना समितीच्या दि. २७/०९/२०१६ रोजीच्या बैठकीत पुनर्वसन प्रकल्पासंदर्भात पुनर्वसनाच्या कामात सुसूत्रता आणण्यासाठी अभ्यास गट स्थापन करण्याचे निर्देश दिले आहेत. सदर निर्देशान्वये, राज्यातील प्रकल्पामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाच्या कामात सुसूत्रता आणण्यासाठी अभ्यास गट स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील प्रकल्पामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाच्या कामात सुसूत्रता आणण्यासंदर्भात शासनाला शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे अभ्यास गटाची स्थापना करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. अध्यक्ष | : अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) |
| २. सदस्य | : विभागीय आयुक्त, कोकण विभाग, श्री. प्रभाकर देशमुख,भा.प्र.से. |
| ३. सदस्य | : जिल्हाधिकारी, अहमदनगर, श्री अनिल कवडे, भा. प्र. से. |
| ४. सदस्य | : उपायुक्त, औरंगाबाद विभाग, श्री. प्रल्हाद कचरे |
| ५. सदस्य | : उपसचिव / सहसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (रस्ते / बांधकाम)/ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग/ विधी व न्याय विभाग |
| ६. सदस्य | : उपसचिव / सहसचिव जलसंपदा विभाग / ग्रामविकास विभाग |
| ७. सदस्य सचिव | : उपसचिव / सहसचिव पुनर्वसन विभाग |
| ८. सदस्य | : उपायुक्त पुनर्वसन कोकण विभाग |
| ९. सदस्य | : उपायुक्त नियोजन विभाग, विभागीय आयुक्त कोकण प्रदेश |
| १०. सदस्य | : उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), ठाणे श्री. जीवन गलांडे |

२. उपरोक्तप्रमाणे गठीत झालेल्या अभ्यास गटाने खालील विषयावर वेळोवेळी बैठका घेऊन तीन महिन्यात शासनाला अहवाल सादर करावा. सदर अभ्यास गटाच्या बैठकीनंतर त्याची इतिवृत्ते तयार करण्याची / माहिती मागविणे व अहवाल तयार करण्याची कार्यवाही उपायुक्त (पुनर्वसन) कोकण यांनी सहसचिव यांच्या समवेत विचारविनिमय करून तयार करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११९१६२६२६५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Hiraman Pawar

Digitally signed by Ramesh Hiraman Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aa1f434613654b0d0749e82a6c619b857e40d5e44e1897e3d9275cd501bb5b74, cn=Ramesh Hiraman Pawar
Date: 2016.11.19 16:29:01 +05'30'

**(रमेश हि. पवार)**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहाय्यक.
४. मा. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक.
५. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
६. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
७. उप सचिव (पुनर्वसन), महसुल व वन विभाग, मंत्रालय.
८. जिल्हाधिकारी, अहमदनगर.
९. उपसचिव / सहसचिव जलसंपदा विभाग/पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग/ग्रामविकास विभाग/विधी व न्याय विभाग.
१०. संबधित अधिकारी
११. अवर सचिव/कक्ष अधिकारी र-१/र-३/र-४/र-८/र-१२
१२. निवड नस्ती, कार्यासन र-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय.